**अर्थसंकल्पीय अनुदान वर्ष २०१६-२०१७.**
**महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी (विशेष घटक योजना) अनुदान.मागणी क्र.वाय-२, २२१५, (२२१५ २०६२) (वेतनेत्तर)**
**ब्रम्हपुरी नगरपरिषद, जिल्हा चंद्रपूर**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नादव-१११७/प्र.क्र.२१/पापु-२१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई-४०० ००१.
दिनांक :- २७ मार्च, २०१७

वाचा
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०/०४/२०१६
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : नादव-१११६/प्र.क्र.३७/पापु-२४, दिनांक १५/०६/२०१६
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : नादव-१११७/प्र.क्र.१४/पापु-२१, दिनांक ३१/०१/२०१७
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : नादव-१११७/प्र.क्र.१३/पापु-२१, दिनांक ०१/०२/२०१७
५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : नादव-१११७/प्र.क्र.१५/पापु-२१, दिनांक २८/०२/२०१७
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : नादव-१११७/प्र.क्र.२४/पापु-२१, दिनांक १७/०३/२०१७

**प्रस्तावना**

सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षासाठी नागरी पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनेतंर्गत मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता,०१-पाणी पुरवठा,१९२-महानगरपालिका/नगरपरिषदांना सहाय्य (०२) राज्य योजना-(०२) (१०) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना) (२२१५ २०६२) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली रुपये ७,००,००,०००/- (रुपये सात कोटी फक्त) एवढे अर्थसंकल्पीय अनुदान मंजूर करण्यात आले असून रुपये ५,६०,००,०००/- ( रुपये पाच कोटी साठ लाख फक्त ) एवढे अनुदान वित्त विभागाकडून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर योजनेसाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून उपरोक्त नमूद क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, परभणी मार्फत पुर्णा नगरपरिषद यांना रु. १०,००,०००/-, क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी अमरावती मार्फत चांदूर रेल्वे नगरपरिषदेस रु. ७,४९,७००/- व शेंदूरजनाघाट नगरपरिषदेस रु. १०,००,०००/-, क्रमांक ४ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी धुळे मार्फत शिरपूर नगरपरिषदेस रु. १२,००,०००/- व दोंडाईचा नगरपरिषदेस रु. ४,२३,११९/-, क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी धुळे मार्फत धुळे महानगरपालिकेस रु. ३२,००,०००/-, तसेच क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी रत्नागिरी मार्फत रत्नागिरी नगरपरिषदेस रु.८,७३,६१७/- एवढे अनुदान मंजूर व मुक्त करण्यात आले आहे. अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु. ५,६०,००,०००/- एवढया अनुदानातून रु. ८४,४६,४३६/- एवढे अनुदान वजा जाता रु. ४,७५,५३,५६४/- इतके अनुदान अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरणासाठी शिल्लक आहे.

२. शासन निर्णय, क्रमांक नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२, दिनांक २५ ऑगस्ट,२००६ अन्वये, नागरी भागातील दलित वस्त्यांकरीता पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करण्यासाठी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना नियमित राबविण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये, नागरी पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनेच्या धोरणात्मक बाबी, योजनेचे सुधारीत व सर्वंकष निकष तसेच योजनेची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे.

३. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांतर्गत घ्यावयाच्या कामांकरीता नागरी स्वराज्य संस्थांना ९० टक्के अनुदान आणि १० टक्के लोकवर्गणी असा वित्तीय आकृतीबंध विहीत करण्यात आला असून नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांतर्गत अनुदानाची रक्कम विशेष घटक योजने अंतर्गत आहे.

४. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजने अंतर्गत हाती घ्यावयाच्या कामांसाठी नागरी स्वराज्य संस्थांच्या वर्गवारीनुसार (बृहन्मुंबई महानगरपालिका वगळून) पुढीलप्रमाणे कमाल शासकीय अनुदान अनुज्ञेय आहे.

( रुपये लाखात )

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्था | कमाल अनुज्ञेय अनुदान |
|---|---|---|
| १ | महानगरपालिका | ३२.०० |
| २ | अ-वर्ग नगर परिषद | १५.०० |
| ३ | ब-वर्ग नगर परिषद | १२.०० |
| ४ | क-वर्ग नगर परिषद | १०.०० |

५. जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांना जिल्हयातील संबंधित नागरी संस्थांना सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदी मधून ( विशेष घटक योजना ) ( योजनांतर्गत ) सदर लेखाशिर्षा अंतर्गत अनुदान मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान मंजूर व मुक्त करण्याचा पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय

नागरी पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत, " नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना " या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरीता जिल्हाधिकारी यांच्याकडे नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनेच्या जिल्हा स्तरावरील संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यात आली आहे. जिल्हाधिकारी यांना या कार्यक्रमाच्या अनुषंगाने आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. हया कार्यक्रमाकरीता शासनाकडून जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांचेमार्फत ब्रम्हपुरी नगरपरिषदेस रु. १०,००,०००/- ( रु. दहा लाख फक्त ) एवढे अनुदान या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून सशर्त वितरीत करण्यात येत आहे. या मंजूर व मुक्त अनुदानाचे जिल्हानिहाय वाटप सोबतच्या विवरणपत्र " अ " मध्ये तर महानगरपालिका व नगरपालिकांच्या वर्गवारीप्रमाणे स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय वाटप विवरणपत्र " ब " मध्ये दर्शविण्यात आले आहे.

- जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांनी सदर अनुदान, यासोबत जोडलेल्या विवरणपत्र-ब मध्ये नमूद केलेल्या संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना पुर्नवाटपाद्वारे वाटप करण्यात यावे.
- हया योजनेअंतर्गत मंजूर व मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.
- संबंधित जिल्हाधिकारी यांनी सदरचे शासनामार्फत मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हयातील संबंधित महानगरपालिका,नगरपालिका यांना पुर्नवाटप करुन तसे शासनास त्वरीत कळवावे.

- संबंधित महानगरपालिका आणि नगरपालिका यांना उपरोक्त मंजूर व मुक्त रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आलेली आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च,२०१७ पर्यंत खर्च करावी.
- जिल्हाधिकारी यांनी या योजनेतंर्गत आपल्या जिल्हयातील संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत निधीचा वर्षनिहाय तपशिल प्राप्त निधीतून हाती घेतलेली कामे, त्यापैकी पूर्ण कामे, अपूर्ण कामे, खर्च झालेली रक्कम व अखर्चित रक्कम इ.बाबतचा अभिलेख ठेवावा व ही माहिती शासनास आवश्यकतेनुसार तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.
- हया योजनेअंतर्गत मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानातून संबंधित महानगरपालिका व नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी, हया योजनांकरीता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत.याबाबत संबंधित कागदपत्रे महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास त्यांना संबंधित महानगरपालिका व नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.
- मुंबई वित्तीय नियम,१९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरीता संबंधित महानगरपालिका, नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी महालेखापाल यांना सादर करावेत.
- हया योजनेअंतर्गत शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत, त्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र (COMPLETION CERTIFICATE), संबंधित महानगरपालिका व मुख्याधिकारी नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी शासनास द्यावयाची आहेत. आयुक्त महानगरपालिका आणि मुख्याधिकारी नगरपालिका यांनी उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र (COMPLETION CERTIFICATE), यांमध्ये दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र (COMPLETION CERTIFICATE), यांवर जिल्हाधिकारी यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी प्रमाणपत्रे शासनास स्विकारार्ह होतील. त्याचप्रमाणे काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र (COMPLETION CERTIFICATE),महालेखापाल यांनाही पाठवावे.
- हया योजनेतंर्गत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मंजूर व मुक्त करण्यात आलेल्या सदर अनुदानाचा विनियोग संबंधित आर्थिक वर्षातच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसारच होईल याबाबतची खबरदारी जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.
- हया योजनेअंतर्गत हाती घेतलेल्या कामाची भविष्यकाळातील देखभाल व दुरुस्तीवरील १०० टक्के खर्च संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी त्यांच्या स्वनिधीतून करावयाचा आहे. हया योजनेच्या देखभाल व दुरुस्तीकरिता शासनाकडून कोणत्याही स्वरुपात अनुदान उपलब्ध करण्यात येणार नाही.
- मंजूर व मुक्त अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व विहीत अहवाल विहित दिनांकास शासनास सादर करावा.

२. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांबाबत क्रमांक नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२, दिनांक २५ ऑगस्ट,२००६ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करावी.

३. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१-पाणी पुरवठा, १९२-महानगरपालिका/नगरपरिषदांना सहाय्य (०२) राज्य योजना-(०२)(१०) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या ( स्थानिक संस्था ) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान ( विशेष घटक योजना ) ( २२१५ २०६२ ) ३१, सहाय्यक अनुदान, ( वेतनेत्तर ), या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१५/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील परिच्छेद ७ ते १८ मधील अटी तसेच परिशिष्ठातील अ.क्र. ९ मधील प्रत्येक अटींची पूर्तता झालेली आहे.

५. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग - तीन, अ.क्र.५, परिच्छेद क्र. २७ (२) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५७/विघयो, दिनांक २३/०३/२०१७ अनुसार त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०३२७१०५२२३८१९२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.27 11:24:20 +05'30'

**( सु.ज. तुमराम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१,(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी.जी.ओ.इमारत,न्यू मरीन लाईन्स,१०१,महर्षि कर्वे मार्ग,मुंबई-४०० ०२०.
२. महालेखापाल,महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखा परिक्षा विभाग कार्यालय,सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर-४४० ००१.
३. विभागीय आयुक्त, नागपूर
४. जिल्हाधिकारी, चंद्रपूर
५. मुख्याधिकारी, ब्रम्हपुरी नगरपरिषद,जिल्हा चंद्रपूर
६. संचालक,नगर परिषद प्रशासन संचालनालय, शासकीय परिवहन सेवा इमारत, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई-४०००२५.
७. संचालक,समाजकल्याण,३,चर्च रोड,सेंट्रल बिल्डिंग,पूणे-४११ ००१.
८. सह संचालक,अनुसूचित जाती उपयोजना (सांख्यिकी),समाजकल्याण,३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग,पूणे-४११००१.
९. अधिदान व लेखा अधिकारी,शासकीय कुटीर,नरीमन पॉईंट,मुंबई-४०० ०२१.
१०. निवासी लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय इमारत,सातवा मजला,वांद्रे-कुर्ला संकुल,वांद्रे(पूर्व), मुंबई-५१.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
१२. जिल्हा प्रकल्प अधिकारी,नगरपालिका प्रशासन, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर
१३. कार्यासन क्र.विघयो-१, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

१४. कार्यासन क्रमांक व्यय-३,बीयुडी-१८ व अर्थोपाय, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.४०० ०३२.

१५. कार्यासन क्र.१४४३ ,१४५१ नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

१६. कार्यासन क्रमांक पापु-०४ व २० पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ००१.

१७. ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,६ वा मजला, विधानभवन,मुंबई-४०० ०३२.
(१० प्रतिसह).

१८. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

१९. निवड नस्ती ( पापु-२१ )

शासन निर्णय क्रमांक :- नादव-१११७/प्र.क्र.२१/पापु-२१, दिनांक २७ मार्च, २०१७ सोबतचे सहपत्र.

नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनें अंतर्गत जिल्हाधिकारी यांना मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हानिहाय विवरण.

**विवरणपत्र- अ**

(रक्कम रुपयात)

| अ.क्र. | जिल्हयाचे नाव | महानगरपालिका | नगर परिषद | एकूण महानगरपालिका/ नगरपालिका | मंजूर व मुक्त अनुदान. |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | चंद्रपूर | ० | ०१ | ०१ | १०,००,०००/- |
| | **एकूण** | **०** | **०१** | **०१** | **१०,००,०००/-** |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.27 11:24:50 +05'30'

**(सु.ज.तुमराम)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्रमांक:- नादव -१११७/प्र.क्र.२१/पापु-२१, दिनांक २७ मार्च, २०१७ सोबतचे सहपत्र

नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनें अंतर्गत जिल्हाधिकारी/महानगरपालिका/नगरपालिका यांना मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हानिहाय महानगरपालिका/नगरपालिकानिहाय विवरण "ब"

| अ. क्र | जिल्हयाचे नाव | नागरी स्थानिक संस्थेचे नाव व वर्ग | योजना | योजनेची किंमत | १०% लोकवर्गणी | ९०% शासनाचा सहभाग | २५.०८.२००६ अन्वये अनुज्ञेय अनुदान | या शासन निर्णयाद्वारे मंजूर व मुक्त अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | चंद्रपूर | ब्रम्हपुरी नगरपरिषद "क" वर्ग | प्रभाग क्र.४ देलनवाडी येथील हनुमाननगर क्रिडा संकुलपासून श्री. मेश्राम घरापासून दक्षिण दिशेने इंजी. प्रभाकर मेश्राम घर ते समोर शतायू हॉस्पीटल पर्यंत १५० मि.मि. सीआय/डीआय वितरण पाईपलाईन टाकणे.<br>प्रभाग क्र.५ येथील टयुबवेल हनुमान मंदिरापासून जि.प.प्राथ.शाळा नंतर श्री.विजय ढोक घरापर्यंत व नंतर श्री. नगराळे घरापर्यंत तसेच श्री. मेश्राम घर ते श्री. ठवरे घरापर्यंत PVC पाईपलाईन टाकणे. | १२,७६,७००/- | १,२७,६७०/- | ११,४९,०३०/- | १०,००,०००/- | १०,००,०००/- |
| **एकूण नपा =१ एकूण ०१** | | | | | | | | **१०,००,०००/-** |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.27 11:25:18 +05'30'

**(सु.ज.तुमराम)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**